**पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अखत्यारितील पोलीस निवासी व कार्यालयीन इमारतींच्या दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. पोप्रमा - ०११७/प्र.क्र.८० /पोल-७,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३१ मार्च, २०१७.

संदर्भ :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-१४/अर्थसं-१/संजना/ ४५/ १७, दि.३१.०३. २०१७.

**शासन निर्णय:-**

सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षाकरीता “मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस (०२) शहर पोलीस (०२)(०१) शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (२०५५ ००९७)” या लेखाशिर्षांतर्गत इतर उद्दिष्टांमधून बृहन्मुंबईतील पोलीस विभागाच्या निवासी व अनिवासी इमारतींच्या दुरुस्तीसाठी (२०५५ ००९७) २७- लहान बांधकामे” या उद्दिष्टातंर्गत एकुण रु.२,८१,६४,०००/- इतका निधी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाने पुनर्वाटप केला आहे.

सदरहू पुनर्वाटप करण्यात आलेला रु.२,८१,६४,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी एक्याऐंशी लक्ष चौसष्ट हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकडे खालील अटींच्या अधीन राहून जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकडे जमा केलेल्या निधीचा स्वतंत्रपणे लेखा (Account) तयार करावा.

२) पोलीस विभागाच्या निवासी व कार्यालयीन इमारतींच्या दुरुस्तीसाठी पोलीस आयुक्तांमार्फत प्रत्यक्ष काम करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करुन देण्यात यावा. या सर्व कामावरती पोलीस गृहनिर्माण महामंडळाचे नियंत्रण व मार्गदर्शन राहील.

३) शासनाच्या मान्यतेशिवाय कोणत्याही प्रकारच्या दुरुस्तीच्या कामांसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येऊ नये.

४) सदर कामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत विहित वेळेत करण्यात यावीत.

५) प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामांना प्रत्यक्ष निधी उपलब्ध झाल्याशिवाय ती सुरु करण्यात येऊ नयेत.

६) पोलीस विभागाच्या इमारतींची दुरुस्तीची कामे केल्यानंतर दुरुस्ती केलेल्या इमारतींच्या आयुर्मानात निश्चीत वाढ होईल व त्या दीर्घकाळ वापरात येतील याची खात्री करण्यात यावी.

७) प्रस्तावास सक्षम प्राधीकाऱ्याची तांत्रिक मान्यता घ्यावी.

८) पोलीस आयुक्तांनी या कामांची आवश्यकता, प्रत्यक्ष निधीची उपलब्धता, गुणवत्ता, प्रगती इ. बाबत आवश्यकतेप्रमाणे सर्वसाधारण आढावा नियमितपणे घ्यावा.

९) या कामांसाठी खर्च करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी पोलीस गृहनिर्माण महामंडळास व शासनास उपलब्ध दयावे.

२. बृहन्मुंबई अंतर्गत पोलीस इमारतींच्या दुरुस्तीच्या कामांसाठी "मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस (०२) शहर पोलीस (०२)(०१) शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (२०५५ ००९७) २७, लहान बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत पुनर्वाटपाद्वारे मंजूर निधी रु.२,८१,६४,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी एक्याऐंशी लक्ष चौसष्ट हजार फक्त) आहरीत करुन पोलीस गृहनिर्माण महामंडळाकडे जमा करण्यासाठी अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून काढून तो पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळास अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१७०४०७११४६२८५६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.04.07 11:47:44 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या, वरळी, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
४. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. वित्त विभाग, (व्यय-७,/ अर्थ-११/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
८. गृह विभाग, (बीयुडी-१/ बीयुडी-२) मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-७).